**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ साठी १४ व महाराष्ट्र विकास सेवा गट-ब साठी १३ अशी एकूण २७ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय, क्रमांक: मविसे १०/२००९/प्र.क्र.७०/आस्था-३
मंत्रालय,मुंबई -४०० ०३२
दिनांक :- ८ जून, २००९

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या महाराष्ट्र विकास सेवा गट-ग च्या उमेदवारांच्या नेमणुका करण्याकरीता महाराष्ट्र विकास सेवा गट-अ या संवर्गाची १४ अधिसंख्य पदे रुपये १५६०० ते ३९१०० + ग्रेड वेतन रुपये ५४०० + इतर भत्ते आणि महाराष्ट्र विकास सेवा गट-ब या संवर्गाची १३ अधिसंख्य पदे रुपये ९३०० ते ३४८०० + ग्रेड वेतन रुपये ४४०० + इतर भत्ते ,या वेतनश्रेणीत दिनांक १ जून २००९ पासून १० महिन्याच्या कालावधीकरीता निर्माण करण्याकरीता शासन मंजूरी देत आहे. संबंधित परिविक्षाधीन अधिका-यांच्या नेमुणका संबंधिचे आदेश स्वतंत्ररित्या काढण्यात येतील.

२. महाराष्ट्र विकास सेवा गट-अ व गट-ब च्या वरील २७ परिविक्षाधीन पदांवरील दिनांक १ .६. २००९ ते ३१.३.२०१० या कालावधीचा खर्च "२०५३-जिल्हा प्रशासन, ०९३- जिल्हा आस्थापना, (३) प्रकल्प गट मुख्यालय , गट विकास अधिकारी ( राज्यक्षेत्र ) (२०५३०७०७) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ११९/०९/व्यय-१५ दिनांक २.६.२००९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२००९०६०८१३०१२६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कैलास शिंदे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व कोषागार अधिकारी,
महालेखपाल, महाराष्ट्र-१ मुंबई / २ नागपूर
मुख्य लेख परीक्षक , स्थानिक निधी लेखा ,नवी मुंबई
उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/नाशिक/पुणे / औरंगाबाद / अमरावती व नागपूर
वित्त विभाग ( अर्थसंकल्प ३ ,१६ व व्यय -१५) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
कार्यासन क्रमांक ,वित्त -१ , वित्त-९ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती (का.क्र.आस्था-३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग